**राज्यात खाजगी विनाअनुदानित पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी/पदविका या स्तरावरील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था, सुरू असलेल्या संस्थेत नवीन अभ्यासक्रम, तसेच अभ्यासक्रमांच्या मंजूर प्रवेशक्षमतेत बदल या प्रयोजनार्थ तंत्र शिक्षण संचालनालय आणि शैक्षणिक संस्था यांचे संयुक्त नावे ठेवण्यात येणाऱ्या मुदत ठेवींवरील व्याजाची रक्कम, मुदतपूर्व संस्थेस परत करण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. टिईडी-२०१८/(प्र.क्र.२३५/१८)/तांशि-५**

मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१८.

**संदर्भ** :- १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.पीईसी-२००१/(९/२००१)/तांशि-१, दिनांक २९/०८/२००१.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. मान्यता-२००८/(२३१/०८)/तांशि-६, दिनांक १४/०१/२००९.

३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. सीटीसी-२०११(प्र.क्र.४२/११)/तांशि-४, दिनांक २४/०१/२०१२.

४. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१३/प्र.क्र.४३/तांशि-४, दिनांक २१/०८/२०१३.

५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. टीईएम-२०१७/प्र.क्र.९४/तांशि-४, दिनांक २३/०५/२०१७.

६. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. टीईएम-२०१७/प्र.क्र.२३/तांशि-४, दिनांक २२/०२/२०१८.

**प्रस्तावना:-**

विना अनुदान तत्वावर पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था सुरू करणे, सुरू असलेल्या संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करणे किंवा अभ्यासक्रमाच्या मंजूर प्रवेशक्षमतेत बदल करण्यासाठीच्या प्रस्तावांकरीता नोंदणी शुल्क आकारणे व संयुक्त खात्यात मुदत ठेव ठेवण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. शैक्षणिक संस्था बंद पडल्यानंतर तेथील कर्मचाऱ्यांचे थकीत वेतन व इतर आर्थिक लाभ देण्याबाबत संस्थेकडून विलंब होतो किंवा ते संस्थेकडून दिले जात नाहीत. त्यामुळे न्यायालयीन प्रकरणे उद्भवतात. या सर्व बाबींचा विचार करुन संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये मुदत ठेवींच्या रकमेत वर नमूद विविध शासन निर्णयांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे. त्यास अनुसरून नवीन संस्था/अभ्यासक्रम सुरू करणे/अभ्यासक्रमांच्या मंजूर प्रवेशक्षमतेत बदल करण्याच्या अनुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय व शैक्षणिक संस्था यांच्या संयुक्त खात्यात ठेवण्यात आलेल्या मुदत ठेवींवरील व्याज, सदर मुदतठेवींची मुदत पूर्ण झाल्यानंतरच मुदतठेवींचे नुतनीकरण करतांना संस्थेच्या खाती जमा करण्याची परवानगी देण्याबाबतची कार्यपध्दती तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून अवलंबण्यात येत आहे.

तथापी, काही शैक्षणिक संस्थांनी पदविका अभ्यासक्रमांसाठी तंत्र शिक्षण संचालनालय आणि संस्था यांचे संयुक्त नावे ठेवलेल्या मुदतठेवींची मुदत पूर्ण होण्यापूर्वीच त्यावरील व्याजाच्या रकमेची मागणी शासनास केली आहे. तथापी संदर्भाधीन शासन निर्णयांमध्ये मुदत ठेवींवरील व्याज, मुदत पूर्ण होण्याअगोदरच संस्थांच्या खात्यात जमा करण्याची स्पष्ट तरतूद नाही. मात्र मुदतपूर्व व्याज प्रदानाची मागणी भविष्यात इतरही खाजगी विनाअनुदानित संस्थांकडून होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

उपरोक्त सर्व बाबींचा सर्वकष विचार करुन तंत्र शिक्षण संचालनालय आणि खाजगी विनाअनुदानित पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी/पदविका संस्था यांचे संयुक्त नावे ठेवण्यात आलेल्या मुदत ठेवींवरील व्याजाच्या रकमेबाबत धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याकरिता पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

खाजगी विनाअनुदानित पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमांच्या नवीन संस्था सुरू करणे, सुरू असलेल्या संस्थेत नवीन अभ्यासक्रम सुरू करणे तसेच अभ्यासक्रमाच्या मंजूर प्रवेशक्षमतेत बदल करणे याकरीता संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये तंत्र शिक्षण संचालनालय आणि शैक्षणिक संस्था यांचे संयुक्त नावे ठेवण्यात येणाऱ्या मुदत ठेवींवरील व्याजाचे मुदतपूर्व प्रदान करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे धोरण निर्धारीत करण्यात येत आहे.

१. खाजगी विनाअनुदानित पदविका, पदवी, पदव्युत्तर पदवी/पदविका संस्थांना शैक्षणिक प्रयोजनासाठी इमारत बांधकाम/पायाभूत सुविधा/कर्मचाऱ्यांचे थकीत वेतन याकरीता बँकाकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करणे या प्रयोजनांकरीता संबंधित शैक्षणिक संस्थेने मागणी केल्यास तंत्र शिक्षण संचालनालय आणि शैक्षणिक संस्था यांचे संयुक्त नावे ठेवण्यात येणाऱ्या मुदत ठेवींवरील व्याजाचे मुदतपूर्व प्रदान करता येईल. याकरीता खालीलप्रमाणे कार्यपध्दतीचा अवलंब करावा.:-

| अ.क्र. | विषय | विहित धोरण |
|---|---|---|
| १. | मुदत ठेवींवरील व्याजाची रक्कम प्रदान करण्याची प्रचलीत कार्यपध्दती. | मुदतठेवींची मुदत संपल्यानंतर त्यावरील व्याज संस्थेच्या खाती विहीत पध्दतीने वर्ग करण्यात येईल. |
| २. | मुदत ठेवींवरील व्याजाची रक्कम मुदतपूर्व संस्थेच्या खाती जमा करणे. | तंत्र शिक्षण संचालनालय व शैक्षणिक संस्था यांचे नावे संयुक्त खात्यामध्ये मुदत ठेव ठेवल्यानंतर, दोन वर्ष पूर्ण झाल्यानंतर सदर मुदतीवरील व्याजाची रक्कम संस्थेच्या खात्यात जमा करण्याबाबत संस्थेला तंत्र शिक्षण संचालनालयाकडे विनंती करता येईल. दोन वर्षाचा कालावधी पूर्ण होण्याअगोदर केलेल्या विनंतीचा विचार केला जाणार नाही. संयुक्त खात्यात मुदत ठेव ठेवल्यानंतर या शासन निर्णयामध्ये वर नमूद केलेल्या कारणांकरीता संस्थेने मुदत ठेवींवरील व्याजाची रक्कम, संस्थेच्या खाती जमा करण्याबाबत तंत्र शिक्षण संचालनालयास विनंती केल्यास, संचालनालयामार्फत मुदत ठेव तशीच ठेवून सदर मुदत ठेवींवरील केवळ व्याजाची रक्कम संस्थेच्या नावे जमा करणेस संस्थेस मुभा दिली जाईल. |
| ३. | मुदत ठेवींवरील व्याजाची मुदतपूर्व मागणी करण्याबाबत विनंती करणे. | संयुक्त खात्यावरील व्याजाची रक्कम मुदत पूर्ण होण्यापूर्वीच संस्थेच्या खाती जमा करण्याची विनंती संबंधित संस्थेला मुदत ठेवीच्या निर्धारीत कालावधीत फक्त एकदाच करता येईल. त्याव्यतिरिक्त आलेल्या विनंती अर्जाची दखल तंत्र शिक्षण संचालनालयाकडून/शासनाकडून घेतली जाणार नाही. |
| ४. | मुदत ठेवींवरील व्याजाची मुदतपूर्व मागणी संस्थांना | संस्थेने स्वत:हून संस्था बंद करणे/संस्थेतील अभ्यासक्रम बंद करणे/अभ्यासक्रमांच्या मंजूर प्रवेशक्षमतेत घट करणे याबाबत अर्ज |

| | | |
|---|---|---|
| | ज्या परिस्थितीत करता येणार नाही, अशी परिस्थिती. | केल्यास किंवा शिखर परिषदेकडून संस्थेस शिक्षा म्हणून संस्था बंद करणे, संस्थेतील अभ्यासक्रम बंद करणे अथवा अभ्यासक्रमांच्या मंजूर प्रवेशक्षमतेत घट केल्यास अशा प्रकरणी संबंधित शासन निर्णय निर्गमित होईपर्यंत संस्थेला मुदत ठेवींवरील व्याजाची मुदतपूर्व मागणी करता येणार नाही. |

२. उपरोक्त बाबींव्यतिरिक्त खालील बाबींचे पालन करणे संस्थांवर बंधनकारक राहील.

१. संस्थेने मुदत ठेवींवरील व्याजाच्या रकमेची ज्या वर नमूद कारणासाठी मागणी केलेली आहे, त्याच कारणासाठी तिचा वापर करणे संस्थेवर बंधनकारक राहील. तसे प्रमाणपत्र मुदत ठेवींवरील व्याजाची रक्कम संस्थेच्या खाती वर्ग केल्यानंतर एक महिन्याच्या आत पूरक कागदपत्रांसह संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

२. मुदत ठेवींवरील व्याजाच्या रकमेची ज्या कारणासाठी मागणी करण्यात आली आहे, त्याव्यतिरिक्त संस्थेने तिचा वापर केल्याचे निदर्शनास आल्यास संस्थेवर संचालनालयामार्फत प्रत्यक्ष करण्यात आलेल्या व्याजाच्या रकमेची पूर्ण एकरकमी वसूली करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल. याबाबतचे अधिकार संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांना राहतील.

३. याबाबतचे प्रस्ताव सबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय यांचेमार्फत प्रमाणित करुन संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचेकडे सादर होणे आवश्यक आहे.

३. हे आदेश सर्व संबंधित शैक्षणिक संस्थांच्या निदर्शनास आणण्यात यावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११२२१२३९४८२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.11.22 12:46:57 +05'30'

**(अ. र. काटकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,
२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
५. सर्व सह संचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत),
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, विभागीय अधिकारी, इंडस्ट्रियल ॲश्युरंन्स बिल्डींग, २ रा माळा, चर्चगेट, मुंबई,
९. उच्च व तंत्र शिक्षण/का.तांशि-१/३/४/७,
१०. निवड नस्ती, तांशि-५.